आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (मॅग्नेट) प्रकल्पास निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मॅग्नेट ०५२२/प्र.क्र.२६१/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २० मार्च, २०२३

वाचा:- १) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक कृपमं-०११८/प्र.क्र.१३/ २१-स, दिनांक ३०.९.२०२०.
२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक योजना-१०२०/प्र.क्र.१८३/ २१-स, दिनांक ०९.१०.२०२०.
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं- २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२
४) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक मॅग्नेट ०५२२/प्र.क्र.२६१/२१-स, दिनांक २९.०७.२०२२.
५) प्रकल्प संचालक, मॅग्नेट संस्था यांचे पत्र क्र. मॅग्नेट/निधी २०२२-२३/५०२/२०२३, दिनांक ०६.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (Maharashtra Agribusiness Network-MAGNET) राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये ६ वर्षासाठी संदर्भ क्र. १ येथील दिनांक ३०.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. मॅग्नेट प्रकल्पासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्याकरीता रु. १००.७४ कोटी व बाह्य हिश्याकरीता रु. १५५.२५ कोटी असे एकूण रु. २५५.९९ कोटी एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर निधीपैकी संदर्भ क्र. ४ येथील दिनांक २९.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य हिश्याकरीता रु. २०.१४ कोटी व बाह्य हिश्याकरीता रु. ३१.०५ कोटी असे एकूण रु. ५१.१९ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता प्रकल्प संचालक, मॅग्नेट संस्था यांनी मागणी केल्यानुसार सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील उपलब्ध असलेल्या निधीतून बाह्य हिश्श्याकरिता रुपये ४८.१७ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) प्रकल्पासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून बाह्य हिश्श्याखाली रु. ४८.१७ कोटी इतका निधी महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) प्रकलपास वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर खर्च पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीत तरतुदीतून भागविण्यात यावा:-

| लेखाशिर्ष | मंजूर निधी (रुपये कोटीत) |
|---|---|
| **मागणी क्र. व्ही -३**<br>४४३५ - इतर कृषीविषयक कार्यक्रमांवरील भांडवली खर्च<br>(०१), पणन व गुणवत्ता नियंत्रण<br>(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका<br>(०१)(०२) आशियाई विकास बँक सहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (मॅग्नेट) (बाह्य हिस्सा ७० टक्के)(कार्यक्रम) ५४-गुंतवणूका<br>**(४४३५ ००५७)** | रु.४८.१७<br>(रुपये अठ्ठेचाळीस कोटी सतरा लाख फक्त) |

३. उपरोल्लिखित निधी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करुन त्याचे वितरण करण्यासाठी श्री. सु.सं. धपाटे, सह सचिव (पणन) (V००१०), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री. सु. ल. काठोळे, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथुन आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

४. या प्रकल्पाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी RTGS सुविधेद्वारे प्रकल्पाच्या बँक खात्यावर जमा करावयाचा असून त्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| बँकेचे नाव | बँक ऑफ इंडिया, स्वारगेट शाखा, पुणे-०९ |
| खात्याचे वर्णन | MAGNET SOCIETY PMU |
| खाते क्रमांक | **050820110000820** |
| IFSC CODE | **BKID0000508** |

५. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी ज्या कारणास्तव मंजुर केलेला आहे, त्याच कारणासाठी विनियोग करण्याबाबत प्रकल्प संचालक, मॅग्नेट संस्था यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्परतेने सादर करावे.

६. प्रकल्प संचालक यांनी सदर प्रकल्पांतर्गत खर्ची पडणाऱ्या निधीची आशियाई विकास बँकेकडून सत्वर प्रतिपूर्ती मिळवावी व मिळालेल्या प्रतिपूर्तीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल पाठवावा.

७. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं- २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३ दिनांक ०४.०४.२०२२ नुसार विहीत केलेल्या अटींची पूर्तता होत असल्याने सदर परिपत्रकान्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३०/का.१४३१, दिनांक ०२.०३.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२१२/२०२३/व्यय-२, दिनांक १०.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२०११२५४२५६०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUGRIV SAMBHAJI
DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2023.03.21 16:05:05 +05'30'

**( डॉ. सुग्रिव सं. धपाटे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री तथा मंत्री (पणन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
३. सह सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग ,मंत्रालय, मुंबई.
४. प्रकल्प संचालक, मॅग्नेट संस्था, पुणे.
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य -२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर.
७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/ऋण व हमी कक्ष), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (१७-स/रोख शाखा) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती (२१-स).